सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल एम.सी.ओ.सी. विशेष खटला क्रमांक १३/२०१० मध्ये शासनातर्फे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. उज्वल निकम यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एसपीपी २०११/३०७/प्र.क्र. ६१/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : २ ऑगस्ट , २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी-२०११/ए.एस.१४/डी चौदा, दिनांक १३.७.२०११

<u>शासन निर्णय</u> :- गुन्हे प्रकटीकरण शाखा, गुन्हा नोंद क्रमांक ९०/२०१० कलम ३०२, ३४ सह १२० (ब) भा.दं.वि. सह ३, २५, २७ हत्यार कायदा सह कलम ३ (१) (i), ३ (२), ३(४) महाराष्ट्र संघटित गुन्हेगारी नियंत्रण कायदा १९९९ (सय्यद हुसेन मदार उर्फ चॉंदभाई यांच्या खुनाचा गुन्हा) मधून उद्‌भवलेल्या आणि सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल एम.सी.ओ.सी. विशेष खटला क्रमांक १३/२०१० मध्ये शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी ॲड. श्री.उज्वल निकम यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक १३.७.२०११ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी त्यांना खालीलप्रमाणे फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | रु. २५,०००/- |
| ब) विचार विनिमय फी (प्रति तास) ( कमाल मर्यादा प्रतिदिन रु. २५,०००/-) | - | रु. ७,०००/- |
| क) हॉटेल लॉजिंग व बोर्डींग प्रतिदिन | - | रु. ३,५००/- |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-४४६/ ११/व्यय-७, दिनांक २९.७.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८०२१७३९३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
ॲड.श्री. उज्वल निकम, ४८ रामदास कॉलनी ,बॅरिस्टर निकम चौक, जळगाव.
निवड नस्ती (पोल-१०)